जिल्हा व सत्र न्यायालय लातूर यांचे नियंत्रणाखालील औसा, देवणी व जळकोट या न्यायालयीन इमारतींना अग्नीशमन यंत्रणा उभारणी / अग्नीप्रतिबंधक उपाययोजना करण्यासाठी देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्द करणेबाबत .................

# महाराष्ट्र शासन
## विधि व न्याय विभाग
### शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २०१७/प्र.क्र.२७/का.१२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ७ फेब्रुवारी, २०१९

वाचा -

१ शासन निर्णय, विधि व न्याय विभाग समक्रमांक, दिनांक ०४.०७.२०१७

२ प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, जिल्हा व सत्र न्ययालय लातूर यांचे पत्र क्रमांक रोविले / २५०४/२०१८, दिनांक २३.०७.२०१८

**शासन निर्णय-**

जिल्हा व सत्र न्यायालय लातूर यांनी प्रबंधक, निरीक्षणे-१, मा.उच्च न्यायालय मुंबई यांचेमार्फत पाठविलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने जिल्हा व सत्र न्यायालय लातूर व त्यांचे नियंत्रणाखालील निलंगा, उदगीर, चाकूर, रेणापूर, औसा, अहमदपूर, देवणी व जळकोट या न्यायालयीन इमारतींमध्ये अग्नीशमन यंत्रणा उभारणी / अग्नीप्रतिबंधक उपाययोजना राबविण्यासाठी मा.उच्च न्यायालय मुंबई यांचेकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांच्या अनुषंगाने संदर्भाधीन दिनांक ०४ जुलै, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यापैकी औसा, जिल्हा लातूर येथे नवीन इमारतीचे बांधकाम सुरु करण्यात आले आहे. देवणी, जिल्हा लातूर येथील नवीन इमारतीचा प्रस्ताव विचाराधीन आहे. तसेच, जळकोट येथे ग्राम न्यायालय कार्यरत असून ते दर आठवड्यातून फक्त एकदा भरते. यास्तव या तीन्ही इमारतींमध्ये अग्नीप्रतिबंधक उपाययोजना करणे आवश्यक नाही असे प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश लातूर यांनी संदर्भाधीन दिनांक २३ जुलै, २०१८ रोजीच्या पत्रान्वये कळविले आहे. यास्तव, संदर्भाधीन अ.क्र. (१) येथील दिनांक ०४ जुलै, २०१९ च्या शासन निर्णयातील परिच्छेद १ खाली नमूद तक्त्यातील अ.क्र. ६ औसा, अ.क्र. ८ देवणी व अ.क्र. ९ जळकोट या न्यायालयीन इमारतींमध्ये अग्नीशमन यंत्रणा उभारणी / अग्नीप्रतिबंधक उपाययोजना राबविण्यासाठी दिलेली प्रशासकीय मान्यता रद्द करण्यात येत आहे. संदर्भाधीन दिनांक ०४ जुलै, २०१७ रोजीच्या शासन निर्णयात परिच्छेद १ मधील ७ व्या ओळीत "तरतुद करुन रुपये १,४४,८२,१९०/- (रुपये एक कोटी चव्वेचाळीस लक्ष ब्याऐंशी हजार एकशे नव्वद फक्त) इतक्या खर्चाच्या कामांस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे." याऐवजी "तरतुद करुन रुपये १,०६,८८,३५५/- (रुपये एक कोटी सहा लक्ष अठ्ठयाऐंशी हजार तीनशे पंचावन्न फक्त) इतक्या खर्चाच्या कामांस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे." असे वाचण्यात यावे. तसेच, परिच्छेद क्रमांक १ खालील तक्त्यामध्ये

| अ.क्र. | न्यायालयीन इमारत | कामाचा अंदाजित खर्च |
|---|---|---|
| १ | लातूर | ३९,२४,००० |
| २ | निलंगा | १४,२०,१५५ |
| ३ | उदगीर | १४,२०,१५५ |
| ४ | चाकूर | १२,५१,९४५ |
| ५ | रेणापूर | १२,५१,९४५ |
| ६ | औसा | १२,५१,९४५ |
| ७ | अहमदपूर | १४,२०,१५५ |
| ८ | देवणी | १२,८९,९४५ |
| ९ | जळकोट | १२,५१,९४५ |
| | एकूण<br>अक्षरी रुपये एक कोटी चव्वेचाळीस लक्ष ब्याऐंशी हजार एकशे नव्वद फक्त | १,४४,८२,१९० |

याऐवजी

| अ.क्र. | न्यायालयीन इमारत | कामाचा अंदाजित खर्च |
|---|---|---|
| १ | लातूर | ३९,२४,००० |
| २ | निलंगा | १४,२०,१५५ |
| ३ | उदगीर | १४,२०,१५५ |
| ४ | चाकूर | १२,५१,९४५ |
| ५ | रेणापूर | १२,५१,९४५ |
| ६ | अहमदपूर | १४,२०,१५५ |
| | एकूण<br>अक्षरी रुपये एक कोटी सहा लक्ष अठ्याऐंशी हजार तीनशे पंचावन्न फक्त | १,०६,८८,३५५ |

असे वाचण्यात यावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०२०७१६०२४४६५१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagyashree Rajendra Bhaidkar

Digitally signed by Bhagyashree Rajendra Bhaidkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d567849462918ceb7579bb2b56247e927c039bbdf028022a8b9ce837a7c854bb, serialNumber=fb84fefefe4ee219c1bc35b35201c14eab0903e8194a7413a74eed93f32afdb0, cn=Bhagyashree Rajendra Bhaidkar
Date: 2019.02.07 16:04:30 +05'30'

**( भाग्यश्री भाईडकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रबंधक (निरीक्षणे १), मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
२. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, लातूर,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता १ / २), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
४. महालेखापाल (लेखा परीक्षा १ /२), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
५. संचालक, महाराष्ट्र अग्नीशमन सेवा संचालनालय, महाराष्ट्र अग्नीशमन सेवा अकादमी, विद्यानगरी, हंस भुंग्रा मार्ग, सांताक्रूझ, मुंबई ४०० ०९८.
६. जिल्हा कोषागार अधिकारी लातूर,
७. उप जिल्हा कोषागार अधिकारी लातूर,
८. वित्त विभाग (व्यय-५), सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), नगर विकास विभाग (नवि-२०), मंत्रालय,
९. विधि व न्याय विभाग (का.१३, २३), मंत्रालय, मुंबई
१०. निवडनस्ती (का.१२)